**किमान अधारभूत किंमत योजनेंतर्गत नाफेडच्या वतीने सन २०१९-२० च्या हंगामातील कडधान्य व तेलबिया खरेदीसाठी महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ, मुंबई यांना रु.२०० कोटीच्या कर्जास दिलेली शासन हमी रद्द करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**वित्त विभाग**

**शासन निर्णय क्रमांक :- शाहमी-२०२०/सपववि/प्र.क्र.२६/अर्थबळ,**

मंत्रालय, मुंबई-३२

दिनांक :- ०८ जुलै, २०२०

**संदर्भ :** १) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र.शाहमी -१०९९/प्रक्र.६८/शा.हमी, दि. ५.११.१९९९.

२) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र.शाहमी -१००८/प्रक्र.१८/शा.हमी,दि.२८.४.२००८

३) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र.शाहमी २०२०/सपववि/प्र.क्र.२६/अर्थबळ, दि.१७.०३.२०२०

**प्रस्तावना:-**

केंद्र शासनाने नाफेड या संस्थेची सन २०१९-२० मध्ये आधारभूत दराने विविध कडधान्ये व तेलबिया यांची खरेदी करण्यासाठी प्रमुख अभिकर्ता म्हणून नेमणूक केली आहे. नाफेडने सदर योजनेच्या अंमलबजावणीसाठी राज्यात महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ, मर्यदित, मुंबई यांची उपअभिकर्ता म्हणून नियुक्ती केली आहे. नाफेडमार्फत पणन महासंघाकडून आधारभूत किंमत योजनेअंतर्गत खरेदी केलेल्या शेतमालाची रक्कम पणन महासंघास उशिराने प्राप्त झाल्यास शेतकऱ्यांचे चुकारे जलदगतीने अदा करता यावेत, यासाठी महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघास राष्ट्रीयकृत बँकेमार्फत रु.२०० कोटी (रुपये दोनशे कोटी) इतके कर्ज उभारण्यास संदर्भाधिन शासन निर्णय दिनांक १७.०३.२०२० अन्वये शासन हमी देण्यात आली आहे. तथापि, नाफेडकडून वेळोवेळी निधी प्राप्त झाला असल्याने सदरहू शासन हमीच्या आधारे राष्ट्रीयकृत बँकेकडून कर्ज उचलण्याची महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघास आवश्यकता भासली नाही. सबब महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघाकडून सदर हमीचा वापर न केल्यामुळे रु.२०० कोटीची शासन हमी रद्द करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-**

प्रस्तुत प्रकरणी महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ, मर्यदित, मुंबई यांनी सादर केलेल्या प्रस्तावाप्रमाणे शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक : शाहमी २०२०/सपववि/प्र.क्र.२६/अर्थबळ, दि.१७.०३.२०२० अन्वये मंजूर करण्यात आलेली रु.२०० कोटीची शासन हमी रद्द करण्यात येत आहे.

२. हा शासन निर्णय सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग/कार्यासन २४ स यांच्या दिनांक २४.०६.२०२० च्या प्रस्तावानुसार व वित्त विभागाचा शासन हमी क्र. १०/२०१९-२० नुसार निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२००७०८१११४५९७७०५ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Jayant Balkrishna Kulkarni

Digitally signed by Jayant Balkrishna Kulkarni
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Finance Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=21c6e2b773a3859ca97c27d5f4e1521c3f812fcd1a7cbeac6f9da1018849c0a7, serialNumber=9def0b6a8723e2ed0b4674c8e4a796ef130132f3686de1ae9848aad4de2445e0, cn=Jayant Balkrishna Kulkarni
Date: 2020.07.08 12:30:34 +05'30'

**( ज. बा. कुलकर्णी )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१) राज्यपालांचे सचिव.
२) मुख्यमंत्र्याचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) मा. उपमुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव,
४) मा. विरोधी पक्ष नेता, विधानसभा/विधान परिषद, विधानमंडळ, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
५) सर्व विधानमंडळ सदस्य, विधानमंडळ,मुंबई.
६) सर्व मंत्री व राज्यमंत्री यांचे स्वीय सहायक,
७) महालेखापाल, महाराष्ट्र १ / २ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई / नागपूर.
८) महालेखापाल, महाराष्ट्र १ / २ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, मुंबई / नागपूर.
९) ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानभवन सचिवालय,मुंबई (५ प्रती)
१०) बहुजन समाज पार्टी, डी-१, इन्सा इटमेंट, आझाद मैदान, मुंबई
११) भारतीय जनता पार्टी, महाराष्ट्र प्रदेश,सी.डी.ओ.बॅरेक्स क्र १, योगक्षेमसमोर,वसंतराव भागवत चौक, नरीमन पॉईंट, मुंबई- ४०००२०,
१२) भारतीय कम्युनिस्ट पार्टी, महाराष्ट्र कमिटी ३१४, राजभवन, एस.व्ही.पटेल रोड, मुंबई- ४०० ००४.
१३) भारतीय कम्युनिस्ट पार्टी (मार्क्सवादी) महाराष्ट्र कमिटी, जनशक्ती हॅाल, ग्लोव मिल पॅलेस, वरळी, मुंबई-१३,
१४) इंडियन नॅशनल कॉंग्रेस पार्टी, महाराष्ट्र प्रदेश कॉंग्रेस (आय) समिती, टिळक भवन, काकासाहेब गाडगीळ मार्ग, दादर, मुंबई- ४०००२५.
१५) नॅशनॅलिस्ट कॉंग्रेस पार्टी, राष्ट्रवादी भवन, फ्री प्रेस जर्नल मार्ग, नरीमन पॉईंट, मुंबई- २१,
१६) शिवसेना, शिवसेना भवन, गडकरी चौक, दादर, मुंबई-४०००२८,
१७) प्रधान सचिव ( पणन ), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१८) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ, मर्यदित, कनमूर हाऊस, नरसी नाथा स्ट्रीट, पो. बॉ. नं.५०८०, मस्जीद बंदर, मुंबई ४००००९.
१९) वित्त विभाग (साउ /व्यय-२ /ऋण व हमी नियंत्रण कक्ष), मंत्रालय, मुंबई.
२०) कार्यासन अधिकारी-२४ स, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई--४०० ०३२.
२१) निवड नस्ती -अर्थबळ.

-----------